**राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात**
**मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन**
**देण्यासाठी क्षेत्रविकास कार्यक्रम**
**<u>राबविण्याबाबत.</u>**
**सन २०११-१२**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्याक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०११/प्र.क्र.९१ /का.७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :** १३ जून, २०११

संदर्भ :- अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.अविवि-२००९ /प्र.क्र.४३/०९ /का.-१, दि. ९ फेब्रुवारी, २००९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन देऊन अल्पसंख्याक समुदायाच्या एकंदर जीवनमानाचा दर्जा उंचावण्यासाठी अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील नागरी क्षेत्राकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला आहे. ही योजना सन २०११-१२ या वर्षात देखील राबविण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील ज्या महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींच्या एकूण लोकसंख्येपैकी किमान १०% लोकसंख्या अल्पसंख्याकांची (मुस्लिम, ख्रिश्चन, बौध्द, जैन, शीख व पारशी) आहे, अशा अल्पसंख्याक बहुल महानगरपालिका/ नगरपालिका /नगरपंचायत क्षेत्रांत खालील मुलभूत नागरी सुविधांच्या उपलब्धतेसाठी शासनामार्फत सन २०११-१२ या वर्षात अनुदान उपलब्ध करुन दिले जाईल:-

(१) कब्रस्तानची व अंत्यविधीच्या जागेची दुरुस्ती * ,
(२) पिण्याच्या पाण्याची सुविधा,
(३) विद्युत पुरवठा,
(४) सांडपाण्याची व्यवस्था,
(५) रस्ते / पथदिवे,
(६) सार्वजनिक स्वच्छतागृहे,
(७) अंगणवाडी , बालवाडी केंद्रे, इत्यादी.

(*महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायती यांच्या अखत्यारीतील कब्रस्तानांबरोबरच ज्या कब्रस्थानांचे व्यवस्थापन नोंदणीकृत सार्वजनिक न्यासांमार्फत केले जाते, अशा कब्रस्तानांनाही या योजनेंतर्गत लाभ अनुज्ञेय असेल.)

या योजनेअंतर्गत महानगरपालिकांना कमाल रु.२० लाख, "अ" वर्ग नगरपालिकांना कमाल रु.१५ लाख तर "ब" व "क" वर्ग नगरपालिकांना आणि नगरपंचायतीना कमाल रु.१० लाखापर्यंत अनुदान उपलब्ध करुन दिले जाईल.

**<u>योजनेची कार्यपध्दती -</u>**

**अ) योजनेंतर्गत अनुदान मिळण्यासाठी संबंधित अल्पसंख्याक बहुल महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींना प्रस्ताव सादर करतांना अनुसरावयाची कार्यपध्दती :-**

या योजनेंतर्गत अनुदान मिळण्यासाठी संबधित महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायत यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात हाती घ्यावयाच्या विकासकामांचे सविस्तर प्रस्ताव संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडे दि. ३० जुलै, २०११ पर्यंत सादर करावेत. महानगरपालिका/नगरपालिका /नगरपंचायतींनी सादर करावयाच्या प्रस्तावात खालील कागदपत्रांचा समावेश असेल.

**i)** या शासन निर्णयासोबतचे प्रपत्र " अ " (परिपूर्णरित्या भरून)

**ii)** क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत विकासकाम हाती घेण्यास संबंधित महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायतींच्या सर्वसाधारण सभेने मंजुरी दिलेल्या ठरावाची प्रत.

**iii)** क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत हाती घ्यावयाच्या विकासकामांचे सविस्तर अंदाजपत्रक.

**iv)** सन २००९-१० या वर्षात संबंधित महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायतीस क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासनाकडून अनुदान मंजुर करण्यात आले असल्यास सदर अनुदानाच्या विनियोगाबाबतचे उपयोजिता प्रमाणपत्र.

**vi)** सन २०१०-११ या वर्षात संबंधित महानगरपालिका/ नगरपालिका/ नगरपंचायतीस क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासनाकडून अनुदान मंजुर करण्यात आले असल्यास सदर अनुदानातून हाती घेण्यात आलेल्या विकासकामांबाबतचा प्रगती अहवाल. (झालेल्या खर्चासह)

**ब) संबंधित अल्पसंख्याक बहुल महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतीनी क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत प्रस्ताव सादर करताना अनुपालन करावयाच्या अटी व शर्ती:-**

**i)** ज्या क्षेत्रात विकास कामे हाती घ्यावयाची आहेत त्या क्षेत्रात अल्पसंख्याकांची लोकसंख्या किमान १०% आहे, याबाबत संबधित महानगरपालिका/नगरपालिका /नगरपंचायत यांनी खातरजमा करावी व या योजनेंतर्गत अल्पसंख्याक संकेंद्रित भागात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदानाचा विनियोग होईल असे पहावे.

**ii)** अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात हाती घ्यावयाच्या विकास कामांचा प्रस्ताव तयार करताना संबंधित महानगरपालिका/नगरपालिका /नगरपंचायत यांनी त्या क्षेत्रातील अल्पसंख्यांक समाजाच्या मुलभूत व निकडीच्या गरजा लक्षात घ्याव्यात. तसेच याआधी शासनाकडून ज्या प्रयोजनासाठी/विकासकामांसाठी निधी मंजूर करण्यात आला होता, अशी प्रयोजने / विकासकामे वगळून अन्य प्रयोजनांसाठी अनुदानाची मागणी केली जाईल, याची दक्षता घ्यावी.

**iii)** या योजनेतून अल्पसंख्यांक समाजाचा सामूहिक लाभ होईल अशी सार्वजनिक हिताचीच कामे हाती घ्यावीत. वैयक्तिक लाभाच्या योजना हाती घेणे कटाक्षाने टाळावे.

**क) अल्पसंख्याक बहुल महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायती यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी व अनुदानासाठी शिफारस :-**

संबंधित महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायत यांच्याकडून प्राप्त झालेल्या सन २००९-१० या वर्षातील विकास कामांच्या पुर्ततेबाबतच्या उपयोजिता प्रमाणपत्रासह तसेच सन २०१०-११ या वर्षात हाती घेतलेल्या विकासकामांबाबतच्या प्रगती अहवालासह चालू वर्षाकरिता या योजनेंतर्गत प्राप्त झालेल्या नवीन प्रस्तावांची छाननी जिल्हाधिकारी कार्यालयाकडून केली जाईल. छाननी दरम्यान ज्या महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायती यांच्या प्रस्तावांमध्ये काही त्रुटी अथवा अपूर्ण कागदपत्रे असल्याचे आढळून येईल, अशा महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतीना त्रुटी/आवश्यक कागदपत्रे यांची १५ दिवसांच्या आत पुर्तता करण्याबाबत जिल्हाधिकारी कार्यालयाकडून कळविण्यात येईल. तद्नंतर संबंधित जिल्हाधिकारी सर्व परिपूर्ण प्रस्ताव आपल्या शिफारशींसह दि. १६ ऑगस्ट, २०११ पर्यंत अल्पसंख्यांक विकास विभागास सादर करतील.

संबंधित जिल्हाधिकारी यांच्या शिफारशीशिवाय शासनास परस्पर प्राप्त झालेल्या महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायत यांचे प्रस्ताव विचारात घेतले जाणार नाहीत. तसेच सन २००९-१० या वर्षात क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत ज्या महानगरपालिका/नगरपालिका /नगरपंचायतींना शासनाकडून अनुदान मंजुर करण्यात आले आहे, अशा महानगरपालिका/नगरपालिका /नगरपंचायतीनी निधीच्या विनियोगाबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे आणि सन २०१०-११ या वर्षात मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून हाती घेण्यात आलेल्या विकासकामांबाबतचा प्रगती अहवाल चालू वर्षाकरिताच्या प्रस्तावासोबत न पाठविल्यास अशा महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींना सन २०११-१२ या वर्षात निधी वितरित केला जाणार नाही, याची नोंद संबंधित आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका /नगरपंचायत व संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावयाची आहे.

**ड) अनुदान वितरण:-**

संबधित महानगरपालिका/नगरपालिका /नगरपंचायत यांनी पाठविलेल्या विकासकामांच्या प्रस्तावांची छाननी संबधित जिल्हाधिकाऱ्यांनी केल्यानंतर त्यांनी शासनाकडे पाठविलेल्या प्रस्तावांची अंतिम छाननी शासनस्तरावर करण्यात येईल. तद्नंतर विहित निकषांनुसार अनुदान मिळण्यास पात्र असलेल्या संबधित महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायत यांना मागणीनुसार परंतु अनुदानाच्या कमाल विहित मर्यादेपेक्षा जास्त नाही, अशा तऱ्हेने अनुदान मंजुर केले जाईल. त्या त्या जिल्हयातील अल्पसंख्याक बहुल महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींना मंजुर करण्यात आलेले अनुदान संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना शासनाकडून वितरीत केले जाईल. तद्नंतर या अनुदानाचे वाटप संबंधित जिल्हाधिकाऱ्यांमार्फत महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायत यांना केले जाईल.

**इ) क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत अल्पसंख्याक बहुल महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे व विकासकामांची छायाचित्रे :-**

शासनामार्फत अनुदान मंजूर करण्यात आल्यानंतर ५ महिन्याच्या आत संबंधित महानगरपालिका / नगरपालिका/नगरपंचायतींनी प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे ( या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र "ब" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात) आणि विकासकामांची छायाचित्रे संबंधित जिल्हाधिकाऱ्यांमार्फत अल्पसंख्यांक विकास विभागाकडे सादर करणे अनिवार्य असेल.

**ई) विकासकाम ज्या ठिकाणी हाती घेण्यात आले आहे, त्या स्थळास शासन प्रतिनिधींच्या प्रासंगिक भेटी:-**

क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत अल्पसंख्याक बहुल महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायत क्षेत्रात हाती घेण्यात आलेल्या अथवा पूर्ण झालेल्या विकासकामांची पाहणी करण्याकरिता शासनाचे अधिकारी प्रत्यक्ष कामाच्या स्थळास प्रासंगिक भेटी देतील व कामाच्या प्रगतीची व दर्जाची तपासणी करुन त्याबाबतचा वस्तुनिष्ठ अहवाल शासनास सादर करतील.

या योजनेसाठी होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१ ए, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक सकेंद्रित क्षेत्रातील क्षेत्र विकास कार्यक्रमाकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदान " या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात येईल व चालू वित्तीय वर्षात या शीर्षाखाली उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०६१३१७११०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( व्यंकटेश भट )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
आयुक्त, सर्व महानगरपालिका,
मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका,
मुख्याधिकारी, सर्व नगर पंचायत,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
निवडनस्ती,

**<u>प्रपत्र - अ</u>**

"अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी क्षेत्रविकास कार्यक्रम" या अल्पसंख्याक विकास विभागातर्फे राबविण्यात येणाऱ्या योजनेसाठी महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतींनी अंदाजपत्रकासह सादर करावयाची माहिती -

१) या योजने अंतर्गत करण्यात येणारी कामे
१)
२)
३)
इत्यादी

२) कामाचा फायदा शहरातील ज्या विभागांना होणार आहे त्या विभागांची नावे
१)
२)
३)
इत्यादी

३) कामांसाठी अंदाजित खर्च
१)
२)
३)
इत्यादी

४) काम पूर्ण होण्यास लागणारा कालावधी
१)
२)
३)
इत्यादी

५) महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतीची एकूण लोकसंख्या- (२००१ च्या जनगणनेनुसार )

६) महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायतीच्या एकूण लोकसंख्येपैकी अल्पसंख्यांक समाजाची लोकसंख्या व टक्केवारी - (२००१ च्या जनगणनेनुसार )

ठिकाण :
दिनांक :

सही
आयुक्त,महानगरपालिका/
मुख्याधिकारी, नगरपालिका/मुख्याधिकारी
नगरपंचायत

## प्रपत्र - "ब"

## उपयोजिता प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. , दि. अन्वये वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधि पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे.

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ | |
| ब | |
| क | |
| ड | |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे.

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)

२. मोजणी पुस्तके (Measurement Books)

३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)

४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपंचायत यांची स्वाक्षरी | संबंधित महानगरपालिका / नगरपालिका /नगरपंचायत ज्या जिल्हयात स्थित आहेत त्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |